जिल्हा पुरवठा अधिकारी, उस्मानाबाद यांना जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०१९/प्र.क्र.२८९/ना.पु.१५**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २९ जुलै, २०२०.

**संदर्भ :-** १) विभाग शासन निर्णय वाहन -२०१२/१६०/प्र.क्र.३८/नापु-१२, दिनांक १२ नोव्हेंबर, २०१२.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक वाहन-२०१६/प्र.क्र.५१/१६/विनियम, दि.२१/०१/२०१७.
३) जिल्हा पुरवठा अधिकारी, उस्मानाबाद यांचे क्र.२०१८/पुरवठा/लेखा/सीआर-९, दिनांक १०/१०/२०१९ चे पत्र.

**प्रस्तावना -:**

विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये वाहन आढावा मंजूर करण्यात आला आहे. यामध्ये जिल्हा पुरवठा अधिकारी, उस्मानाबाद यांचेकरिता १ वाहन (जीप) मंजूर आहे. जिल्हा पुरवठा अधिकारी, उस्मानाबाद यांनी दिनांक १०/१०/२०१९ च्या पत्रान्वये निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठी सादर केलेल्या प्रस्तावास मंजूरी देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय-:**

जिल्हा पुरवठा अधिकारी, उस्मानाबाद यांना त्यांच्या कार्यालयातील वाहन क्र. MH 25 C 6330 या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या ₹६,००,०००/- (अक्षरी रूपये सहा लक्ष फक्त) इतक्या खर्चास खालील अटींच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

I. वाहन अनुज्ञेय असणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या वापरात फक्त एकच वाहन असावे.
II. कोणत्याही परिस्थिती वाहन चालकाचे नवीन पद निर्माण करण्यात येऊ नयेत.
III. नवीन वाहन खरेदीकरीता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात उपलब्ध निधीतून खर्च करण्यात यावा.
IV. नवीन वाहन खरेदीकरीता ₹६.०० लक्षच्या मर्यादेत {वाहनाची किंमत + वस्तु व सेवा कर + टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभूत साहित्य इ. अंतर्भूत करुन (एकूण रु.६ लक्ष च्या मर्यादेत) } खर्च करण्यात यावा.
V. सदर वाहन खरेदी ही प्रचलित शासन तरतुदीनुसार/नियमानुसार करण्यात यावी.

VI. सदर खरेदी करताना त्या संबंधीच्या नेहमीच्या कार्यपद्धतीविषयी नियमांचे आणि इतर सर्व निदेशांचे काटेकोर पालन करण्याची जबाबदारी तसेच त्यामध्ये कोणत्याही प्रकारची अनियमितता आढळल्यास त्याची जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकारी, उस्मानाबाद यांची राहील.

VII. नवीन वाहन खरेदीनंतर सदर वाहनाची नोंद महावाहन प्रणालीवर करण्यात यावी.

२. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या विनियम कार्यासनाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.सचिव/(व्यय) दिनांक ११/०२/२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२९१६२४३४६१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Dattopant Saraf

Digitally signed by Milind Dattopant Saraf
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d8450ee89cd863fe6ee37a1ae9a08856aba16105c18d8f6e7e5d173cd0667f3, serialNumber=39f812c92f84e6a543334dae987c5249971ef4b978b731b085658e03fe7e1d4d, cn=Milind Dattopant Saraf
Date: 2020.07.29 15:57:59 +05'30'

**( मिलिंद द. सराफ )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१. जिल्हाधिकारी, उस्मानाबाद.
२. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
३. जिल्हा पुरवठा अधिकारी, उस्मानाबाद.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद.
५. महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव मार्फत)
८. वित्त विभाग-१० व्यय, विनियम,प्रशा-५, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती- नापु.१५.